"सहकारी सूतगिरण्यांना वित्तीय संस्थांकडून मिळणा-या कर्जावरील१२% व्याजाचे प्रदान करणेबाबत.
नागपुर जिल्हा कापुस उत्पादक सहकारी सुतगिरणी मर्या. पाटणसावंगी, जि. नागपूर."

# महाराष्ट्र शासन

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्र.सूतगि- ३३१९/प्र.क्र.४०/टेक्स-१ (अ)**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २६ ऑक्टोबर, २०२०

**वाचा :-**

१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. धोरण- १०१६/प्र.क्र.९६/टेक्स-१ (अ), दि.११ जानेवारी, २०१७.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. संकीर्ण- २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा-५, दि.१० मे, २०१६ .
३) सहआयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांचे पत्र क्र.कार्या. ६(१)/सूतगि/१०७२/२०२०, दि.२६.०२.२०२०.
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं- २०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि.१६.०४.२०२०.
५) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. अर्थसं- २०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि.०४.०५.२०२०.
६) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.सूतगि- ३३१९/प्र.क्र.४०/टेक्स-१ (अ), दि.१६.०९.२०१९.

**प्रस्तावना :-**

शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.धोरण-१०१६/प्र.क्र.९६/टेक्स-१ (अ), दि.११ जानेवारी, २०१७ अन्वये, सहकारी सूतगिरण्यांना वित्तीय संस्थांकडून / रा. स. वि. नि. कडून रु.३,०००/- प्रति चाती प्रमाणे ५ वर्षांच्या मुदतीसाठी कर्ज घेण्यास परवानगी देण्यात आली असून सदर कर्जावरील ५ वर्षांचे कमाल १२% पर्यंतचे व्याज शासन भरणार आहे. ज्या सहकारी सूतगिरण्यांनी यापूर्वी शासनाकडून घेतलेल्या बिनव्याजी कर्जाची परतफेड केली आहे, अशाच सूतगिरण्या या योजनेसाठी पात्र समजण्यात येतील. सदर शासन निर्णयास अनुसरुन या सूतगिरणीस वाचा येथील अ.क्र.६, येथील शासन निर्णय, दि.१६.०९.२०१९ अन्वये, सप्टेंबर, २०१९ ते मार्च, २०१९ या कालावधीसाठी रु.३६,२५,७२२/- इतका निधी यापूर्वी वितरीत करण्यात आलेला आहे.

सदर शासन निर्णयास अनुसरुन नागपुर जिल्हा कापुस उत्पादक सहकारी सुतगिरणी मर्या. पाटणसावंगी, जि. नागपूर या सूतगिरणीने सांगली जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक लि, शाखा मिरज रोड, जि. सांगली या बँकेकडून प्रती चाती रु.३०००/- प्रमाणे घेतलेल्या रु.७३४.४० लक्ष इतक्या कर्जावरील एप्रिल, २०१९ ते डिसेंबर, २०१९ या कालावधीतील८.५% अनुज्ञेय व्याजाचे प्रदान एच.डी.एफ.सी बँक, शाखा शंकर नगर, नागपूर या बँकेस करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. धोरण-१०१६/प्र.क्र.९६/टेक्स-१ (अ), दि.११ जानेवारी, २०१७ अन्वये शासनाने घेतलेल्या निर्णयास अनुसरुन खालील तक्त्यात दर्शविलेल्या नागपुर जिल्हा कापुस उत्पादक सहकारी सुतगिरणी मर्या., पाटणसावंगी, जि. नागपूर या सहकारी

सूतगिरणीच्या नावासमोरील स्तंभ क्र.६ मध्ये दर्शविलेल्या बँकेला स्तंभ क्र.५ मध्ये दर्शविलेल्या व्याजाच्या रकमेचे प्रदान करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. या सूतगिरणींने थकित बिनव्याजी कर्जाची परतफेड केल्याची खातरजमा करुन घेऊन सदर व्याजाचे प्रदान करण्यात येत आहे.

| सूतगिरणीचे नाव | चात्यांची संख्या | बिनव्याजी कर्ज घेतले होते काय ? असल्यास त्याची परतफेड केली आहे का? | चात्यांच्या प्रमाणात कोणत्या वित्तीय संस्थेकडून /रा.स. वि. नि. कडून किती कर्ज घेतले आहे ? व व्याजाचा दर | १२% पर्यंतच्या व्याजाची रक्कम व व्याजाचा कालावधी | ज्या खात्यात व्याजाची रक्कम जमा करावयाची त्याचा तपशील |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| Nagpur Zilha Kapus Utpadak Sahakari Sootgirni Maryadit, Patansaongi, Dist. Nagpur. | २४४८० | होय. रु.१४८.५९ लाख इतकी संपूर्ण रक्कम परतफेड केली आहे. | रु.७५० लाख. एच.डी.एफ.सी. बँक, शाखा शंकर नगर, नागपूर. व्याज दर - ८.५% | रु.४७,०३,१७८/- (एप्रिल, २०१९ ते डिसेंबर, २०१९) | H.D.F.C. Bank, Branch Shankar Nagar, Nagpur. Acc. no. 50200033179350 IFSC Code - HDFC0004487 |
| (रु.सत्तेचाळीस लाख तीन हजार एकशे अठ्याहत्तर फक्त) | | | | रु.४७,०३,१७८/- | |

२. वित्त विभाग, परिपत्रक, दि.१६.०४.२०२० सोबतच्या परिशिष्टातील अ.क्र. ८ मध्ये नमूद केल्यानुसार, "४५ - व्याज प्रदाने" या बाबीखालील खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले आहेत. तसेच सदर परिपत्रकामधील परिच्छेद ५-१० या प्रकरणी लागू होत नसून इतर तरतुदींची पूर्तता खालीलप्रमाणे होत आहे -

१) एखाद्या योजनेस / प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देणे - सदर सहकारी सूतगिरणीने वित्तीय संस्थांकडून घेतलेल्या कर्जावरील १२% पर्यंतच्या व्याजाचे प्रदान संबंधित वित्तीय संस्थांना करण्याबाबत मा. मंत्रीमंडळाच्या मान्यतेने दि.११ जानेवारी, २०१७ रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे.

२) नियतव्यय उपलब्धता - "२०४९ २५५१" या लेखाशिर्षाखाली सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात या लेखाशीर्षाखाली रु.२०००लक्ष इतका निधी खर्च करण्यास उपलब्ध आहे.

३) विभागास प्रदान वित्तीय अधिकार - वित्त विभाग, परिपत्रक , दि.१६.०४.२०२० नुसार "४५- व्याज प्रदाने" या बाबीखाली खर्च करण्यास विभागास वित्तीय अधिकार प्राप्त आहेत.

३. वित्त विभाग, परिपत्रक क्र. संकीर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा.५, दि.१० मे, २०१६ मधील परिच्छेद- अ) नुसार प्रस्तुत प्रकरणाची माहिती खालीलप्रमाणे आहे -

१) विभागास प्रदान वित्तीय अधिकार:- वित्त विभाग, परिपत्रक, दि.१६.०४.२०२० अन्वये “४५-व्याज प्रदाने” या बाबीखाली निधी खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले आहेत.

२) मंजूर निधी - (२०४९ २५५१) या लेखाशिर्षाखाली सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात रु.२०००लक्ष इतका निधी उपलब्ध करुन देण्यात आला आहे.

३) मागील ३ महिन्यांपूर्वी दिलेल्या अनुदानापैकी ७५% किंवा अधिक निधी खर्च झाला आहे - लागू नाही.

४) ज्या लेखाशीर्षाखाली अनुदान वितरीत करण्यांत येत आहे, त्या लेखाशीर्षांतर्गत १ वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही - लागू नाही.

५) स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान देतांना त्यांचेकडून राज्य शासनास येणे नाही किंवा येणे रक्कम समायोजित करण्यांत आली आहे - लागू नाही.

६) वैयक्तिक लाभार्थीचे देयक सादर करतांना यादीसह व शक्यतो आधार क्रमांकासह सादर करावे - लागू नाही.

७) बांधकाम विषयक प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देतांना सक्षम अधिकाऱ्याची मान्यता घेतल्याचा उल्लेख आदेशात असावा - लागू नाही.

८) खरेदी विषयक प्रक्रिया संबंधित अद्यावत शासन आदेशानुसार करावी व तसा उल्लेख प्रशासकीय मान्यतेत असावा - लागू नाही.

९) साहित्य खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नावे ECS द्वारे आहरीत करावी - लागू नाही.

४. वित्त विभाग, परिपत्रक, दि.१० मे, २०१६ मधील परिच्छेद-ब) मधील २) नुसार, वित्त विभाग, परिपत्रक, दि.१६.०४.२०२० च्या परिशिष्टातील अनु. क्र. ५-१० या प्रकरणी लागू नाहीत व परिशिष्टातील अ.क्र. १ बाबत नमूद करण्यात येते की, सदर योजना ही अनिवार्य असून भारित स्वरूपाची आहे.

५. वित्त विभाग, परिपत्रक, दि.१० मे, २०१६ मधील परिच्छेद-ब मधील ३ नुसार, वित्त विभाग परिपत्रक दि.१६.०४.२०२० सोबतच्या परिशिष्टातील अनु. क्र. ३ तसेच ८ मधील तपासणी सुचीमधील बाबी या प्रकरणी लागू नाहीत.

६. यासाठी होणारा खर्च “ मागणी क्र. व्ही-१, २०४९- व्याज प्रदाने, ०१ देशांतर्गत ऋणावरील व्याज, २००- देशांतर्गत इतर ऋणांवरील व्याज (०२), इतर संस्थांकडून मिळणा-या कर्जावरील व्याज (०२) (०६) वित्तीय संस्थांकडून मिळणा-या कर्जावरील व्याज (अनिवार्य) (२०४९ २५५१)” भारित ४५ - व्याज” या लेखाशिर्षाखाली सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात मंजूर केलेल्या तरतुदीमधून भागविण्यात यावा .

७. आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी नागपुर जिल्हा कापुस उत्पादक सहकारी सुतगिरणी मर्या. पाटणसावंगी, जि. नागपूर या सूतगिरणीने वित्तीय संस्थेकडून घेतलेल्या कर्जावरील यापुढील कालावधीसाठी देय होणा-या व्याजप्रदानाचा तिमाही अहवाल शासनास सादर करावा.

८. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेली रु.४७,०३,१७८/- इतकी रक्कम अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून आहरीत करुन उपरोक्त परिच्छेद-१ मधील तक्त्यातील स्तंभ क्र.५ मधील व्याजाची रक्कम स्तंभ क्र.६ मध्ये नमूद केलेल्या बँकेच्या खाते क्रमांकामध्ये RTGS द्वारे वितरीत करण्याची कार्यवाही करण्याकरीता श्री. र. गं. बोड्डू, कार्यासन अधिकारी (रोख शाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२ यांना “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणून

घोषित करण्यात येत आहे. तसेच, श्री. विशाल मदने, उप सचिव (सूतगिरणी) (V०००९) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२ यांना "नियंत्रण अधिकारी"म्हणून घोषित करण्यात येत आहे.

९. वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेला निधी संबंधित बँकेस वितरीत केल्यानंतर आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर रक्कम प्राप्त झाल्याबाबतचे प्रमाणपत्र संबंधित बँकेकडून प्राप्त करुन घ्यावे व त्याची प्रत शासनास सादर करावी.

१०. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.४ व ५ येथील दि.१६.०४.२०२० व दि.०४.०५.२०२०रोजीच्या परिपत्रक व शासन निर्णय नुसार विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०१०२६१६३३०६६१०२.असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Prasenjeet Karlekar

Digitally signed by Prasenjeet Karlekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-operating Marketing And Textiles Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d219c43caa42a6d2c11a62256b2ff3ad939a420c9fb6fa0cb24c384214bcee8c, cn=Prasenjeet Karlekar
Date: 2020.10.26 16:39:36 +05'30'

**(प्रसेनजित कारलेकर)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) महालेखाकार, महाराष्ट्र- १ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षा), मुंबई / नागपूर.
२) मा. मंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) सचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहायक, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) आयुक्त, वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर .
५) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे.
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
८) सहसंचालक, लेखा व कोषागारे,संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, मंत्रालय, मुंबई.
९) वित्त विभाग, व्यय-२/अर्थसंकल्प-३ व १३, मंत्रालय, मुंबई.
१०) अ. स. (कार्यासन १७ स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) शाखा व्यवस्थापक, एच.डी.एफ.सी बँक, शाखा शंकर नगर, नागपूर.
१२) कार्यकारी संचालक, नागपुर जिल्हा कापुस उत्पादक सहकारी सुतगिरणी मर्या. पाटणसावंगी, जि.नागपूर.
१३) का.अ. (रोख शाखा), सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई (३ प्रती).
१४) निवड नस्ती (टेक्स-१ (अ) / टेक्स-१ (ब)).